# मराठी ग्रंथकारसभेस पत्र

मराठी ग्रंथकारसभेस पत्र

"ग्रंथकारांच्या मार्गातील अडचणी दूर व्हाव्या म्हणून" न्या. रानडे व "लोकहितवादी" गोपाळ हरी देशमुख यांनी १८७८ सालच्या मे महिन्यात "मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी" ची स्थापना केली आणि ११ मे, १८७८ रोजी पुण्याला ग्रंथकारांचे पहिले संमेलन भरवले. याबाबत न्या. रानड्यांचे चरित्रकार न. र. फाटक यांनी दिलेल्या माहितीनुसार "हे संमेलन यशस्वी झाले नाही. ग्रंथकार जातीने थोडे आले होते. पुष्कळांनी पत्र पाठविली होती. जे आले होते त्यांची सरबराई योग्य रीतीने झाली नाही. संमेलन एका दिवसात आटोपले". (न्या. रानडे यांचे चरित्र: १९२४, पृष्ठ २९७) २४ मे, १८८५ रोजी न्या. रानड्यांनी पुढाकार घेऊन ग्रंथकारांचे दुसरे संमेलन भरवले. या संमेलनात सहभागी होण्यासंबंधी रानड्यांनी १३ मे, १८८५ रोजी जोतीराव फुल्यांना पत्र पाठवून विनंती केली होती. त्या पत्रास फुल्यांनी पाठविलेले उत्तर 'ज्ञानोदय' ने ११ जून, १८८५ च्या अंकात छापले होते.

ग्रंथकारांच्या या दुसऱ्या संमेलनाचा "एकंदर थाट पूर्वीसारखाच होता. फारसे ग्रंथकार आले नाहीत. ग्रंथकारांची पत्र आली होती" असे न. र. फाटकांनी रानडे चरित्रात लिहिले आहे (पृष्ठ ३७५).

# मराठी ग्रंथकारसभेस पत्र

वि. वि. आपलें ता. १३. माहे मजकूरचें कृपापत्रासोबतचें विनंतिपत्र पावलें. त्यावरून मोठा परमानंद झाला. परंतु माझ्या घालमोठ्या दादा, ज्या गृहस्थाकडून एकंदर सर्व मनुष्याच्या मानवी हक्काविषयीं वास्तविक विचार केला जाऊन ज्यांचे त्यांस ते हक्क त्यांच्याने खुषीनें व उघडपणें देववत नाहींत. व चालू वर्तनावरून अनुमान केलें असतां पुढेंही देववणार नाहींत, तसल्या लोकांनी उपस्थित केलेल्या सभांनीं व त्यांनीं केलेल्या पुस्तकांतील भावार्थांशीं आमच्या सभांचा व पुस्तकांचा मेळ मिळत नाहीं. कारण त्यांच्या पूर्वजांनीं आम्हांवर सूड उगविण्याच्या इराद्यानें, आम्हांस दास केल्याचें प्रकर्ण त्यांनी आपल्या बनावट धर्मपुस्तकांत कृत्रिमानें दडपलें. याविषयीं त्यांच्यांतील जुनाट खल्लड ग्रंथ साक्ष देत आहेत. यावरून आम्हां शूद्रादि अतिशूद्रांस काय काय विपत्ति व त्रास सोसावे लागतात, हे त्यांच्यांतील ऊंटावरून शेळ्या वळणाऱ्या ग्रंथकारांस व मोठमोठ्या सभास्थानीं आगांतूक भाषण करणारांस कोठून कळणार? हें सर्व त्यांच्या सार्वजनिक सभेच्या उप्तादकांस जरी पक्कें माहीत होतें, तरी त्यांनीं फक्त त्यांच्या व आपल्या मुलाबाळांच्या क्षणिक हिताकरितां डोळ्यावर कातडें ओढून त्याला इंग्रज सरकारांतून पेनशन मिळतांच तो पुन: अट्टल जात्याभिमानी, अट्टल मूर्तिपूजक, अट्टल सोवळा बनून आपल्या शूद्रादि अतिशूद्रांस नीच मानूं लागला; व आपल्या पेनशनदात्या सरकारनें बनविलेल्या कागदाच्या नोटीससुद्धां सोवळ्यानें बोट लावण्याचा विटाळ मानूं लागला! अशीच कां शेवटी ते सर्व आर्य ब्राहमण या हतभाग्य देशाची उन्नति करणार! असो, आता यापुढें आम्ही शूद्र लोक. आम्हांस फसवून खाणाऱ्या लोकांच्या थापांवर भुलणार नाहींत. सारांश, यांच्यांत मिसळल्यानें आम्हा शूद्रादि अतिशूद्रांचा काही एक फायदा होणें नाहीं, याबद्दल आमचा आम्हीच विचार केला पाहिजे. अहो, त्या दादांना जर सर्वांची एकी करणें असेल, तर त्यांनी एकंदर सर्व मानवी प्राण्यांत परस्पर अक्षय  बंधूप्रीति काय केल्यानें वाढेल, त्याचें बीज शोधून काढावें व तें पुस्तकाद्वारें प्रसिद्ध करावें. अशा वेळीं डोळे झांकणे उपयोगाचें नाहीं. या उपर त्या सर्वांची मर्जी. हे माझें अभिप्रायादाखल छोटेखानी पत्र त्या मंडळीच्या विचाराकरितां तिजकडे पाठविण्याची मेहेरबानी करावी. साधे होके बुढ्ढेका येह पहिला सलाम लेव.

आपला दोस्त<br>
जोतीराव गो. फुले<br>
(ज्ञानोदय, दि. ११ जून १८८५)

-----समाप्त----